**सेवानिवृत्त शासकीय कर्मचाऱ्यांना निवृत्तिवेतन विषयक लाभ वेळेवर अदा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक, क्रमांक: सेनिवे १००३/ २८४ /सेवा-४**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२**
**दिनांक: ११ डिसेंबर २००३**

**<u>प रि प त्र क</u>**

सेवानिवृत्त होणाऱ्या शासकीय कर्मचाऱ्यांना त्यांच्या निवृत्तीनंतर लगेचच निवृत्तिवेतन विषयक लाभ प्रदान केले जावेत यासाठी शासनाने यापूर्वी वेळोवेळी सविस्तर सूचना दिलेल्या आहेत. तथापि बऱ्याच कार्यालयाकडून या सूचनांचे योग्यरित्या पालन होत नसल्याचे महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र मुंबई यांनी शासनाच्या निदर्शनास आणलेले आहे. काही प्रकरणी महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १, महाराष्ट्र, मुंबई यांनी असेही निदर्शनास आणले आहे की, महालेखापालांनी उपदान प्रदान आदेश निर्गमित केल्यानंतर एका वर्षाचा कालावधी उलटून गेला तरी उपदानाच्या रकमांचे प्रदान संबंधितांना करण्यात आले नाही व परिणामी महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ च्या नियम ३५८ च्या तरतूदीनुसार सदरहू आदेश महालेखापालांकडे पुनःश्च विधीग्राह्य (revalidate) करण्यासाठी पाठविले जात आहेत.

२. याद्वारे सर्व कार्यालय / विभाग प्रमुखांना पुन्हा असे निदेश देण्यात येत आहेत की, त्यांनी निवृत्तिवेतन विषयक लाभांच्या प्रकरणांना प्राधान्य द्यावे व अशी प्रकरणे विलंब न होता, लवकरात लवकर निकाली काढली जातील या विषयी सर्वतोपरी दक्षता घ्यावी. यासाठी निवृत्तिवेतन व उपदान प्रत्यक्ष देण्याच्या व प्राधिकृत करण्याच्या विविध कार्यपध्दतींबाबत महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन), नियम १९८२ मधील प्रकरण-१० मध्ये विहित केलेले वेळापत्रक काटेकोरपणे पाळले जाईल, त्याचप्रमाणे महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मधील निवृत्तिवेतन विषयक लाभ प्रदान/संवितरीत करण्यासंबंधात जे नियम विहीत करण्यात आलेले आहेत, त्यांचेही योग्यरित्या पालन केले जाईल याची काळजी घ्यावी. निवृत्तिवेतन विषयक लाभ प्रदान करण्यास विलंब होऊन त्यावर व्याजाचे प्रदान करण्याची वेळ शासनावर आल्यास त्याची पूर्ण जबाबदारी विभाग/ कार्यालय प्रमुखांवर राहील याची नोंद घेण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

वसन्त वा. चौधरी,
शासनाचे उप सचिव.

प्रति,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- १, महाराष्ट्र, मुंबई (२० प्रती),
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- २, महाराष्ट्र, नागपूर (२० प्रती),
महालेखापाल (लेखापरीक्षा)- १, महाराष्ट्र, मुंबई (५ प्रती),
महालेखापाल (लेखापरीक्षा)- २, महाराष्ट्र, नागपूर (५ प्रती),
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई (५ प्रती),
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (२० प्रती),
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
निवासी लेखा परीक्षा अधिकारी , मुंबई
मंत्रालयातील सर्व विभाग (आस्थापना व निवृत्तिवेतन कक्ष) (२ प्रती)
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती, कार्यासन सेवा-४.

-------

H-965- (5000+25-12-03)